महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक: सीएसएफ-१०८९/८३०/सीआर-१०/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २१ मार्च, १९८९.

## शासकीय परिपत्रक

रशियातील आरमेनिया येथे झालेल्या प्रलयकारी भूकंपामध्ये नुकसान पोहोचलेल्या लोकांना मदत करण्यासाठी मा. पंतप्रधान यांनी " प्राईममिनिस्टर आरमेनिया अर्थक्वेक रिलिफ फंड" असा निधी स्थापन केला आहे. भूकंपग्रस्तांना मदत करण्यासाठी पंतप्रधानांनी भारतातील जनतेला मदतीचे आवाहन केलेले आहे. त्या आवाहनास अनुलक्षून महाराष्ट्रातील जनतेतर्फे द्यावयाच्या मदतीसाठी महाराष्ट्र शासनाने मा. मुख्यमंत्र्यांच्या अध्यक्षतेखाली " आरमेनिया भूकंपग्रस्त सहाय्यता निधी " समितीची स्थापना केलेली आहे. त्याचप्रमाणे राज्यमंत्री, नगरविकास व पर्यावरण यांच्या अध्यक्षतेखाली एका उप समितीची स्थापना केलेली आहे. मा. राज्यमंत्री नगर विकास व पर्यावरण यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्रातील कामगार / कर्मचारी वर्गाचे तसेच निरनिराळ्या औद्योगिक कामगार संघटनांचे प्रतिनिधी ह्यांच्या बैठकीत सर्वानुमते असे ठरले की, प्रत्येक कामगार/कर्मचाऱ्यांनी आरमेनिया भूकंपग्रस्त निधीसाठी किमान पांच रुपये देणगी द्यावी. ही रक्कम संबंधित कर्मचाऱ्यांच्या, कामगारांच्या मासिक वेतनातून कापून घ्यावी, त्यासाठी सर्व कामगारांची / कर्मचाऱ्यांची संमती आहे, असे गृहीत धरण्यात यावे. अशी देणगी देण्यास ज्या कर्मचाऱ्यांची / कामगारांची इच्छा नसेल त्यांनी त्याबाबत संबंधित अधिकाऱ्यांना लेखी कळवावे.

२. बैठकीत घेतलेल्या वरील निर्णयाच्या अनुषंगाने इच्छुक शासकीय अधिकारी / कर्मचारी यांच्याकडून देणग्या गोळा करण्यासाठी शासन खालील प्रमाणे सूचना देत आहे :-

[१] तृतीय व चतुर्थश्रेणी इच्छुक कर्मचाऱ्यांच्या बाबत त्यांच्या इच्छेनुसार देणगीची रक्कम मार्च १९८९ च्या पगाराचे वाटप करताना जमा करण्यात यावी. अशी रक्कम मार्च १९८९ च्या पगारातून वाटप करताना जमा करणे शक्य न झाल्यास ती एप्रिल १९८९ च्या पगारातून जमा करण्यास हरकत नसावी.

[२] वर्ग १ व वर्ग २ च्या इच्छुक अधिकाऱ्यांनी त्यांच्या इच्छेनुसार देणगीची रक्कम रोखीने वा चेकने त्यांच्या विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुखाकडे वरील प्रमाणे मार्च अथवा एप्रिल १९८९ च्या पगारातून सुपूर्द करावी व त्याबाबतची पोच घ्यावी.

[३] प्रत्यक्ष वेतन बिलामध्ये या रकमा कापून घेतल्याचे दाखवू नये. परंतु पगार देण्याकरिता तयार करण्यात आलेल्या वेतन स्टेटमेंटवर त्या जमा करण्यात आल्याचे दाखविण्यात यावे. शासकीय कर्मचाऱ्यांकडून या रकमा मिळाल्याचे रोख पुस्तकामध्ये दर्शविण्यात यावे व त्या रकमा आरमेनिया भूकंपग्रस्त सहाय्यता निधीला देणगी म्हणून खर्च खाती दाखविल्याचे दर्शविण्यात यावे.

कृ. मा. प.

[४] मंत्रालयीन विभाग/सर्व विभाग/कार्यालय प्रमुखांनी अशाप्रकारे गोळा करण्यात आलेल्या रकमा मंत्रालयातील मुख्यमंत्र्यांच्या सचिवालयाकडे रोखीने, धनादेशाने अथवा बँकेच्या डिमांड ड्राफ्टने पाठवाव्या व पोच पावत्या घ्याव्यात. [देणग्या सामान्य प्रशासन विभागाकडे पाठविण्यात येऊ नयेत].

३. "आरमेनिया भूकंपग्रस्त सहाय्यता निधीस" अधिकारी, कर्मचारी यांच्याकडून देणग्या स्विकारण्यास कर्मचाऱ्यांच्या संघटनांनी संमती दर्शविली आहे. तरी देणग्या ऐच्छिक असल्यामुळे एखाद्या कर्मचाऱ्याने देणगी देण्यास नकार दिला तर त्याच्या वेतनातून रक्कम कापून घेऊ नये.

४. वर नमूद केल्याप्रमाणे आरमेनिया भूकंपग्रस्त सहाय्यता निधीस जिल्हा परिषदा/विविध महामंडळे/शासनाचे अंगिकृत उपक्रम तसेच महानगरपालिका/परिषदा इत्यादी संस्था यामधील इच्छुक अधिकारी/कर्मचारीही देणग्या देऊ शकतील.

५. मुख्यमंत्र्यांच्या कार्यालयाने सदर देणग्या स्विकारून प्रत्येक विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना पोच पावती देण्याची व्यवस्था करावी. हे परिपत्रक वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-७०/८९, कोषा-४, दिनांक १५ मार्च, १९८९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शि. शा. शिरीजगनेर,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोकायुक्त, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे सर्व व्यवस्थापकीय संचालक,
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई [प्रसिद्धी पत्रक काढण्याच्या विनंती सह],
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
वित्त विभाग, कोषा-४,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन क्रमांक १९, २१, २५, २६,
निवड नस्ती.